**विधी अनुवाद व परिभाषा सल्लागार समितीची पुर्नरचना करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय,क्रमांक-एलएनजी-२००४/१०१३/प्र.क्र.०१/२००५/२०ब,
मंत्रालय,मुंबई-४०००३२,
दिनांक : ११ फेब्रुवारी,२००५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-एलएनजी-१०९८/१५०६/ प्र.क्र.११६/९८/२०ब,दिनांक १५ जून २००१.
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-एलएनजी-१००१/१३०७/ प्र.क्र.८९/२००१/२०ब,दिनांक ७ ऑगस्ट २००४.
३) भाषा संचालनालयाचे, क्रमांक-विपस-२००३/७०/१५९५/१०,११,१६, दिनांक २५ ऑगस्ट २००४ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एलएनजी-१००१/१३०७/ प्र.क्र.८९/२००१/२०ब,दिनांक ७ ऑगस्ट २००४ अन्वये, १९९७ मध्ये पुनर्स्थापित करण्यात आलेल्या विधी अनुवाद व परिभाषा सल्लागार समितीस, राज्यातील न्यायदानात मराठीचा वापर करण्याच्या दृष्टीने केंद्रीय व राज्य शासनातर्फे करण्यात आलेल्या विद्यमान तसेच भविष्यकाळात मंजूर करण्यात येणारे अधिनियम/नियम इ. चा अचूक मराठी अनुवाद उपलब्ध व्हावा या दृष्टीने दि. १ एप्रिल २००४ पासून कायमस्वरुपी मुदतवाढ देण्यात आलेली आहे. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १५ जून २००१ अन्वये सदर विधी अनुवाद व व परिभाषा सल्लागार समितीची यापूर्वी पुर्नरचना करण्यात आली असल्याने,भाषा संचालनालयाच्या वर उल्लेखित दि. २५ ऑगस्ट २००४ च्या पत्रान्वये सदर समितीच्या पुनर्रचनेबाबत पाठविलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

समितीची कार्यकक्षा लक्षात घेता समितीवर केवळ संबंधित विषयातील तज्ञ व्यक्तींचीच नियुक्ती करणे योग्य असल्याने शासन पुढील प्रमाणे विधी परिभाषा व सल्लागार समिती पुनर्गठित करीत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्री.न्या.चंद्रशेखर धर्माधिकारी. | से.नि.न्यायमूर्ती उच्च न्यायालय,मुंबई, | अध्यक्ष |
| २ | श्री.द.भा.कुरणे. | निवृत्त प्राचार्य, विधी महाविद्यालय,कोल्हापूर | सदस्य |
| ३ | ॲड.श्री.शांताराम दातार. | ॲडव्होकेट,जिल्हा न्यायालय, | सदस्य |
| ४ | डॉ.श्रीमती रुपा कुलकर्णी. | संस्कृत तज्ञ,नागपूर विद्यापीठ,नागपूर | सदस्य |
| ५ | श्री.भा.ना.शेटये. | माजी सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ | सदस्य |
| ६ | डॉ.श्री.सत्यरंजन साठे. | से.नि.प्राचार्य,विधी महाविद्यालय,पुणे. | सदस्य |
| ७ | डॉ.न.ब.पाटील. | से.नि.भाषा संचालक. | सदस्य |
| ८ | उप प्रारुपकार - नि-उपसचिव | विधी व न्याय विभाग,म.शा.मंत्रालय. | सदस्य |
| ९ | प्रतिनिधी (अध्यक्ष/मंडळाचे सदस्य) | राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. | सदस्य |
| १० | सदस्य सचिव. | यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान कायद्येविषयक मोफत सल्ला व सहाय्य फोरम. | सदस्य |
| ११ | उप सचिव / सह सचिव (अधिनियम कामकाजाविषयी संबधित) | विधान मंडळ सचिवालय. | सदस्य |
| १२ | प्राध्यापक प्रतिनिधी. | शासकीय विधी महाविद्यालय,चर्चगेट, मुंबई. | सदस्य |
| १३ | भाषा संचालक. | भाषा संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य सचिव. |

समितीच्या अध्यक्ष, तसेच शासकीय व अशासकीय सदस्यांच्या अटी व शर्ती, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-एलएनजी-१०९४/५०३/ प्र.क्र.५४/९१/२०ब,दिनांक १७ सप्टेंबर १९९७ प्रमाणे राहतील.

उपरोक्त बाबींवर होणारा खर्च "२०५२-सचिवालयीन सर्वसाधारण सेवा ०९२-इतर कार्यालये (०३) (०१) भाषा संचालक (दत्तमत्त) सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-४ " हया अर्थसंकल्पीय शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो भाषा संचालनालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(शांतीप्रकाश गो.ठाकूर)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपुर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
समितीचे सर्व सदस्य (भाषा संचालनालयामार्फत),
भाषा सचांलक,महाराष्ट्र राज्य,मुंबई (२५ ज्यादा प्रती),
विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-३२,
वित्त विभाग/व्यय-४/सेवा-५,विसु-१,
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
निवड नस्ती.